साहित्य निर्मितीमध्ये मोलाचे कार्य करणाऱ्या प्रकाशन संस्थेस श्री.पु.भागवत पुरस्कार २०१४ जाहीर करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः श्रीपुभा-१०१४/प्र.क्र.११३/२०१४/भाषा-३,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**तारीख: २५ फेब्रुवारी, २०१५.**

वाचा :

१) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.श्रीपुभा-२०११/प्र.क्र.१९६/सां.का.४, दिनांक ३० जुलै, २०११,

२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.पूरक-२०११/प्र.क्र.१५०/सां.का.४, दिनांक १३ एप्रिल, २०१२.

३) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.श्रीपुभा-१०१४/प्र.क्र.११३/२०१४/भाषा-३, दिनांक १२ फेब्रुवारी, २०१५.

**प्रस्तावना :**

साहित्य निर्मिती क्षेत्रात लक्षणीय कामगिरी करणा-या उत्कृष्ट प्रकाशन संस्थेस, मराठी प्रकाशन व्यवसायात मोलाचे कार्य करणारे श्री.पु.भागवत यांच्या नांवे पुरस्कार देऊन गौरविण्याचा निर्णय संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला असून, **या पुरस्काराचे स्वरुप रु.३,००,०००/-(रुपये तीन लक्ष फक्त) मानचिन्ह व मानपत्र असे आहे.**

साहित्य निर्मिती क्षेत्रात भरीव व लक्षणीय कामगिरी करणाऱ्या प्रकाशन संस्थेस सन २०१४ या वर्षाचा श्री.पु.भागवत पुरस्कार जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मराठी साहित्य निर्मितीमध्ये लक्षणीय व उल्लेखनीय कार्य करणाऱ्या प्रकाशन संस्थेस श्री.पु.भागवत यांचे नांवे पुरस्कार प्रदान करण्याकरीता संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या समितीच्या निर्णयानुसार **सन २०१४ या वर्षाचा श्री. पु. भागवत पुरस्कार "श्री. केशव भिकाजी ढवळे प्रकाशन, मुंबई" या संस्थेस जाहीर करण्यात येत आहे.**

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्रमांक झेडएफ-०२, २२०५, कला व संस्कृती ०० १०२ कला व संस्कृती प्रचालन ०१ (योजनेतर योजना) (०१) (०३) - उत्तम पुस्तकांना उत्तेजन - (२२०५ ३१९९) - ५०

इतर खर्च (योजनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत प्रकरणी होणाऱ्या खर्चासाठी सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यासही या आदेशाद्वारे प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१५०२२५१६०४४४६६३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Aparna Arvind Gawde
Date: 2015.02.25 18:11:35 +05'30'

**( अपर्णा अ.गावडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.मंत्री (मराठी भाषा) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
३. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
४. संचालक (माहिती व वृत्त) , माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
५. सचिव (मराठी भाषा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
६. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
७. अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ, पुणे,
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२. वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई,
१३. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई,
१४. सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई,
१५. अवर सचिव (अर्थसंकल्प), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. **भाषा-३ (संग्रहार्थ).**